उप संचालक, तंत्र शिक्षण, तंत्र शिक्षण संचालनालय / सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ,महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशासकीय सेवा, गट-अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससेप्र-२०१८/प्र.क्र.(८७/१८)/तांशि-१,**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०३ नोव्हेंबर, २०२०.

संदर्भ:- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांक : १५(१)/(६०)/२६००/सात,दि. २७ मार्च, २०१८.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन पत्रान्वये उपसंचालक, तंत्र शिक्षण, तंत्र शिक्षण संचालनालय / सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशासकीय सेवा, गट-अ या पदाकरिता केलेल्या शिफारशीनुसार खालील उमेदवाराची त्यांच्या नावासमोर स्तंभ-६ मध्ये दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी, ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा पदभार स्वीकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी तात्पुरत्या स्वरूपात नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | नियुक्तीचा प्रवर्ग | पदाचे नाव / पदस्थापनेचा तपशील |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | १ | **श्री.मानकर विजयकुमार हरीश्चंद्र** | **इ.मा.व** | **अराखीव** | **उपसंचालक,तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई,** |

२. उपरोक्त उमेदवाराची नियुक्ती ही खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहे:-

१) उपरोक्त उमेदवाराची वेतनश्रेणी (रु. १५६००-३९१०० अधिक ग्रेड वेतन रु. ६९००/- ) अशी राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता त्यांना अनुज्ञेय राहील.

३) उपरोक्त उमेदवारांस प्रथम वेतनवाढ परिवीक्षाधीन कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिवीक्षाधीन कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर अनुज्ञेय राहील.

४) उपरोक्त उमेदवारांचे परिवीक्षाधीन कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, असमाधानकारक अथवा अपेक्षित दर्जाची न आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) उपरोक्त उमेदवाराने हिंदी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा त्यास सदर भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ प्रचलित नियमानुसार रोखून ठेवण्यात येईल.

६) उपरोक्त उमेदवार परिच्छेद क्र.१ येथे नमूद पदावर नियुक्ती होण्यापूर्वी शासन सेवेत कार्यरत असल्याने व सदर पदावर त्यांची नियुक्ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत नामनिर्देशनाने करण्यात येत असल्याने त्यांची वेतन निश्चिती वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/ सेवा-३, दि.२३ मार्च, १९९४ अन्वये विहीत अटींनुसार करण्यात यावी. तसेच त्यानुसार त्यांना परिवीक्षाधीन कालावधीतील वेतनवाढी अनुज्ञेय करण्यात याव्यात.

७) उपरोक्त उमेदवाराने सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत नियुक्तीच्या ठिकाणी रुजू व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्वीकारली नाही अथवा प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत काहीही कळविले नाही तर, कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

८) उपरोक्त उमेदवारांचे वैद्यकीय तपासणी अहवाल व चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल शासनास प्राप्त झाले आहेत. त्याबाबतची नोंद संबंधितांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

९) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/०८/२००९ मधील तरतुदीनुसार दि. १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर, अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-१००६/८७/सेवा-४,दि. १२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधीत शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८/०८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यास नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल.

१०) उपरोक्त उमेदवारांचे सेवानिवृत्तीचे वय शासनाच्या प्रचलित नियमानुसार राहील.

११) उपरोक्त उमेदवारांस नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१२) उपरोक्त उमेदवारांस शासकीय सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास त्यास शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि. ०२/१२/१९९७ मधील तरतुदीनुसार शासनास किमान एक महिन्याची पूर्वसूचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील.

३. उपरोक्त उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी रूजू व्हावे व त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत शासनास सादर करावा .

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०३१७४५३३४२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sameer Laxman Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: CN = Sameer Laxman Dhere, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Higher and Technical Education Department
Date: 2020.11.03 17:51:54 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.मानकर विजयकुमार हरिश्चंद्र, फ्लॅट नं २६, आराधना सहकारी सोसायटी, चिंतामणी नगरी नं.१,बेसा रोड, नागपूर- ४४००२७.

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
६) संचालक, तंत्र शिक्षण, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ,मुंबई
८) सर्व विभागीय सहसंचालक,तंत्रशिक्षण (संचालनालयामार्फत)
९) सर्व प्राचार्य/संचालक,शासकीय अभियांत्रिकी/औषधनिर्माणशास्त्र/तंत्रनिकेतन महाविद्यालये.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती/ तांशि-१.